***संपादिका :***

अनघा हिरे (नाशिक)

***मुखपृष्ठ :***

आदिती हिरे (iiइयत्ता ९ वी)

***प्रकाशन :***

ई साहित्य प्रतिष्ठान

www.esahity.com

9869674820
E mail : balnetakshari@gmail.com
9422284116

कथा

*1} परी *** अनघा हिरे*

*2} चिऊची बाळं *** रजनी अरणकल्ले*

*3} अपरिग्रह ** राजेश मोराणकर*

*4} नोकर कोण आणि मालक कोण ***श्रीपाद पु. कुलकर्णी*

कविता

1.}दिवाळी... अरविंद बुधकर

2}रवीवारची शाळा *** विशाल कुलकर्णी

3}ए आई, सांग नाSSSSS, कधी येइल बाबा घरा?

4}कुठे गेली शिस्त! *** श्रीपाद पु कुलकर्णी

5} कोकण महाराष्ट्राची शान ***तनया देवळे

6)बंड्रूचा रेनकोट *** ज्योती कपिले

7)''तडम तडम तडतड ताशा *** ज्योती कपिले.

8}मित्र माझे छान छान! *** अरुण वि.देशपांडे

9} फळभाज्यांची सभा *** सौ. प्राजक्ता पराग म्हात्रे

10} चक्रम-विक्रम *** शशिकांत पानट

11}आभाळाच्या पलीकडे *** शशिकांत पानट

मुलांशी हितगुज

(पु.ल देशपांडे)

बाल संस्कार

रेसिपी

*बीट जाम,*

*कवठ जेली*

हाय , हॅलो
मग काय मित्रांनो
कसे आहात?

अगदी मजेत आनंदात असणारच प्रश्नच नाही कारण लहानपण हे मजा करण्यासाठी तर असते. आता तर काय सहामाही परीक्षाही संपल्या आहेत. आणि दिवाळीची तयारी पण जोरदार चालू असणार. दिवाळी सर्वांचाच आवडता सण आहे. सगळे भरभरून मजा करतात. दिवाळीचे तुमचे प्लानिंग सुद्धा झाले असणार? एक दम झक्कास! हे वातावरणच फार छान असते. सगळ्यांनी मिळून साफ सफाई करायची. मग आईने केलेल्या फराळाच्या पदार्थांवर ताव मारायचा. आणि ताई दादाMMबरोबर मस्तपैकी आपले आकाशकंदील करायचा नाहीतर पणत्या रंगवायच्या, किल्ला बनवायचा. मस्त मज्जाच येत असते ना. मला तर हे वातावरण जाम आवडते . शिवाय दिवाळीच्या दिवशी सकाळी लवकर उठून अभ्यंग स्नान. फराळ करायचा आणि दिवसभर दिवाळी अंक वाचत बसायचा किती मजा येते ना. चला मी तर दिवाळीची पुरेपूर मजा घेणार आहे तुम्ही सर्वजण आनंदाने दिवाळी साजरी करा. आणि आम्हाला मेल पाठवून सांगा ह्या दिवाळीत तुम्ही काय काय मजा केली. मेल आयडी माहित आहे ना? हो हो अगदी बरोबर तोच तो आपला नेहमीचा....

सर्वांना दिवाळीच्या खूप खूप खूप शुभेच्छा.
आनंदी रहा आणि मजा करा.
अनघा

# 1}परी... अनघा हिरे

भल्या मोठ्या ढगांचा वाडा

कुणाचा बरं असेल सांगा जरा

अहो हा वाडा तर आपल्या लाडक्या परी राणीचा !

परी राणी आपली त्या वाड्यातच राहते ,

इंद्रधनुष्यावर स्वार होऊन फुलपाखरांशी खेळते,

चंद्र चांदण्यांबरोबर लपंडाव खेळते,

पक्ष्यांबरोबर गाणे गाते.

सुंदर ही सोनुली सर्वांची आवडती जिवाभावाची मैत्रीण आहे . ढगात तिच्याशिवाय कुणाला करमतच नाही .

आकाशातली परी सर्वांची लाडकी सर्वांना आनंद देण्यात कायम मग्न झाली. ढगातच राहून आज ती फार कंटाळली. विचार केला सारे जग सुंदर आहे, तर ते बघून यावे, भटकून यावे.

धरतीवर जावे, आणि तिथला थोडा आनंद सोबत घेऊन यावे.

मग धरतीवर जाण्याचा तिने निश्चय केला. आनंद भरून घ्यायला सोबत घेतली एक मोठी पेटी आणि घेतले मित्र पाच....



एक ससा आणि पक्षी चार.

दोन दिवसात परत ये बरं ! नाही तर तुला आकाशात प्रवेश मिळणार नाही.

लक्षात असू दे हा नियम .

देवाने तिला बजावून सांगितले.

“लवकरच परतेल” सांगून सगळ्यांचा निरोप घेऊन ती रमत गमत निघाली.

आकाशातून फिरता फिरता तिने बघितला निळा निळा समुद्र . समुद्रात खेळायची तिला खूप ईच्छा झाली. मनात विचार केला थोडावेळ समुद्रात विहार करावा,

सुंदर सुंदर मासे बघावे,

माश्यासवे थोडे खेळावे.

परीला समुद्र खूप आवडला. समुद्रात ती खूप खूप खेळली मोती वेचले. आपल्या पंखावर सजवले,शंख शिंपल्याची माळ केली. आपल्या गळ्यात घातली .

समुद्रात ती हींड हींड हिंडली , फिर फिर फिरली.

बघता बघता तीन चार दिवस निघून गेले. अन अचानक तिला देवाच्या वाक्याची आठवण झाली.

परी खूप घाबरली. लगबग लगबग करू लागली.

आकाशाकडे धाव घेऊ लागली.

छे पण तिला आत प्रवेश मिळालाच नाही.  चहू बाजूचे दरवाजे तिच्यासाठी बंद झाले.

आता काय करावे? ती रडू लागली. परी रडली तस तिचे पंख नष्ट झाले. आता तर तिला उडताही  येणार नव्हते.

हे देवा मला माफ कर मी चुकले. मला पार भूल पडली पुन्हा माझ्याकडून ही चूक होणार नाही  तू मला परत परी रुपात स्वीकार. परी बिच्चारी गयावया करू लागली.

पण छे! तिच्या विनवणीचा देवावर काही परिणाम झाला नाही .

"  सोनुली, परीने सर्वांना आनंद द्यायचा असतो तिने कधीच रडायचे नसते हे तूला माहित नाही  का? तुझ्या रडण्यामुळे तुझे  पंख नष्ट झाले. आता मी तुला पंख देऊ शकणार नाही



परीचे दु:ख बघून चंद्र,चांदण्या, पक्षी सारे सारे देवाला विनवणी करू लागले .

" अरे घाबरू नका ज्या समुद्रामुळे परी आपले देहभान विसरली त्या समुद्रातल्या जीवांना सुद्धा आपल्या सोनुलीची गरज आहे.

त्यांना सुद्धा आनंद द्यायला हवा ना! म्हणून आजपासून आपली परीही समुद्रात राहिल. तिला पंख जरी नसले  तरी पाण्यात पोहण्यासाठी माश्यासारखी लांब शेपूट असेल.”

सगळे खूप आनंदी झाले. मग चंद्रावर स्वार होऊन परी समुद्रात पोहोचली

....आणि आजपासून आपली ही परी जलपरी झाली.



# 2} चिऊची बाळं ...... रजनी अरणकल्ले

एक असते चिऊ. एक काऊ. त्यांना दोन मुलं असतात. मोठा चार वर्षांचा,लहान दोन वर्षांचा. काऊ,रोज बाहेर जाऊन दाणे टिपुन आणत असे. चिऊ,ते शिजवून आपल्या बाळांना भरवत असे. जे दाणे मिळत ते खाऊन काऊ,चिऊ व दोन्हि बाळं सुखात आनंदात रहात होते. त्यांच्या शेजारीच मैनाताई व पोपटराव यांचे घरटे होते. त्यांनाहि त्याच वयाची दोन मुलं होती. पोपटराव रोज नवनवीन पदार्थ खाण्यास आणत असे. कधी लाल लाल पेरु, तर कधी हिरवी मिरची,तर कधी डाळिंबांचे दाणे..! रोज चांगले-चुंगले पदार्थ मैनाताई आपल्या बाळांना बरोबरीने वाटुन देत असे.पण त्यांची मुलं मात्र त्यासाठी रोज भांडत असत.प्रत्येकाला दुसऱ्यापेक्षा जास्त हवे असे. पोपटरावांनी कीतीही  जास्त आणले तरी मुलांचे समाधान होत नसे. मैनाताई रोज चिऊच्या मुलांना तेच तेच खाताना पहात असे. मुले तेच ते खाऊनसुद्धा  आनंदात खेळत बागडत असत. तिने पाहिले की चिऊ आपल्या हाताने मुलांना भरवते. मैनाताईने पण आपल्या मुलांना स्वतःच्या हाताने भरवण्याचा प्रयत्न केला. दोन दिवस चांगले गेले. पण पुन्हा येरे माझ्या मागल्या..! आता मात्र मैनेला चिऊचा हेवा वाटु लागला. तिने लक्ष देऊन चिऊला आपल्या बाळांना भरवताना पाहिले. तिच्या लक्षात आले,की चिऊ आपल्या लहानग्याला छोटा घास भरवते, मोठ्याला मात्र मोठ्ठा घास देते..!मैनेला तर काय फावलेच.तिने
काय केले, लहानग्याला हळुच बाजुला बोलावले.म्हणाली,‘छोटू कीती बारीक झालास रे तू, आई तुला कमी खायला देते व मोठुला जास्त देते, म्हणुन तू वाळलास रे बाबा’. छोटु म्हणाला ‘असे

काही  नाही  मैनाकाकी, मी तर बरा आहे.’मैनाताई म्हणाली, ‘तुम्हाला चिऊ भरवु लागली की लक्ष दे,  पहा म्हणजे कळेल’.छोटु , हे मैनाकाकीच बोलणं सगळं विसरुनच गेला होता. रात्र झाली सगळे आपापल्या घरट्यात झोपी गेली. दुसऱ्या दिवशी नेहमी प्रमाणे दुपारी, झाडाच्या सावलीत बसुन गोष्टी सांगत,चिऊ आपल्या दोन्ही बाळांना घास भरवत होती. दोघेही  हसत खेळत गोष्ट ऐकत जेवत होती. मैनाताई तिथे आली. व त्यांना पहात बसली.छोटुचे तिच्याकडे लक्ष गेले. तिने त्याला ईशारा केला, घास पहा असे डोळ्याने खुणावून सांगितले. छोटु सहज कुतूहल म्हणुन,आई भरवत असलेल्या प्रत्येक घासाकडे लक्षपुर्वक पाहु लागला. आणि खरेच, आपला घास दादाच्या घासापेक्षा लहान असतो, हे त्याला कळले.त्याला आईचा राग आला.दिवसभर तो गप्प गप्पच होता. दुसऱ्या दिवशीपण असेच झाले! आई आपल्याला कमी जेवण देते अशी त्याची समजुत झाली. झालं,मग काय,त्याचं वागणं बोलणं

बदललं. तो हट्टी होऊ लागला. दादाशी सारखं भांडु लागला. एवढ्या तेवढ्या कारणावरुन चिड्चिड करु लागला. दोन दिवस त्याचे असे त्रागा करण्यात गेले. घरातील शांतता व आनंदी वातावरण बिघडु लागले.

चिऊ काऊच्या लक्षातच येईना, नेमकं छोट्याचं काय  बिनसलंय. मैनाताई मात्र खूश होत्या. चिऊ काऊचा संसार आदर्श राहिला नव्हता न! आता मात्र त्यांच्या आदर्शाचे धडे तिला कोणी सांगणार नव्हते. बाहेर चिऊकाऊची मुलं भांडत होती, घरट्यात मैनाताई खुशीत येऊन गुणगुणत होती. पोपटरावांनी, मैनाताईच्या खुशीच कारण विचारलं. मैनाताई हसली  मात्र  फक्त. पोपटरावच्या लक्षात आल, काही तरी  काळंबेरं आहे, मैनाताईचंच काही  कारस्थान आहे.

पोपटराव तसे स्वभावाने खुप चांगले होते. त्यांची व काऊची लहनपणापासुनची मैत्री होती. काऊचे

कष्ट तो पहात होता. पण काऊला कष्टांचे फळ तसे कमीच मिळत असे, हे पोपट जाणून होता. पोपटरावने तर अधुन मधुन काऊच्या मुलांसाठी पेरु, डाळिंबांचे दाणेही देऊ केले होते. पण स्वाभिमानी काऊने ते साभार परत केले होते. काऊचे म्हणणे असे होते की या गोष्टिंची मुलांना सवय लागेल. आपण त्यांची मागणी पुरवू शकलो नाहि तर..! काऊचिऊ व त्यांची मुले सुखासमाधानात आहेत, हे पाहुन पोपटराव कृतकृत्य होत असे. पण गेले दोन दिवस काऊचिऊ काळजीत होते. मुलांमधला समंजसपणा कमी होत होता, हे पोपटरावच्या ध्यानी आले होते. आज मैनाताईला गुणगुणताना पाहुन मात्र पोपटरावांनी ओळखले की हिनेच काही तरी केलंय. पोपटराव चिऊकडे गेला. तिला म्हणाला,‘छोट्याला जवळ घे,त्याला विश्वासात घे.त्याला नेमके काय हवे आहे,काय झाले आहे विचारुन घे. मैना काहि बोलली का असे विचार.’ चिऊने तसेच केले. छोट्याला जवळ घेवून गोंजारत त्याला विचारले.छोट्यानेही सांगितले, तू दादावर माझ्यापेक्षा जास्त प्रेम करतेस.‘ असे का वाटले बाळा तुला’ चिऊने त्याच्या पाठीवर हात फिरवित विचारले. त्याने लहान-मोठ्या घासा बद्दल सांगितले. चिऊच्या डोळ्यात टचकन पाणी आले. ती हळुच डोळे पुसत, मनाशी काही ठरवतंच ऊठली.

दुपारच्या जेवणाची वेळ झाली होती. चिऊने नेहमीप्रमाणे दोघांना खाऊ घालण्यास सुरुवात केली. एक घास मोठ्याला व तेवढाच घास छोट्याला भरवु लागली. दुसऱ्या घासातच छोट्याला जोराचा ठसका लागला. चिऊने छोट्याच्या पाठीवरुन हात फिरवला. दादाने लगेच पाणी दिले. चिऊ दादाला घास देऊ लागली. दादा म्हणाला थांब थोडं, बाळाचा ठसका बरा होऊ देत, मग आम्हा दोघांनाही एकत्र भरव. थोड्यावेळाने चिऊ छोट्याला घास भरवू लागली. छोटा म्हणाला,‘अगं आई थोडंथोडं दे, एकदम मोठा घास चोचित मावत नाही गं.’ चिऊआई हसली.

छोटुच्याही  लक्षात आले, ती का हसली ते! दोघांच जेवण झालं. छोटु आईला बिलगला, ‘आई गं सॉरी, मैनाकाकीच कध्धी म्हणजे कध्धी ऐकणार नाही ..!’ छोटु दादाला म्हणाला, ‘दादा चल पटकन, खेळायला चल..!’

चिऊच्या डोळ्यात मात्र आनंदाश्रु होते. काऊने एक मोठा सुस्कारा सोडला. पोपटराव मैनाताईकडे मिष्किलिने पहात होते.मैनाताई मात्र मनातल्या मनात चरफडत होती.पोपटराव मैनाताईला म्हणाले,‘अगं अजुनही  काही   बिघडलं नाही . मुलांना समजावून सांगत जा, मुलं शहाणी आहेत, समजेल त्यांना’. मैनाताईने मात्र चिऊशी मैत्री करायची, असे मनातल्या मनात ठरवुन टाकले..!



## 3} अपरिग्रह

"मावशी थायलंडला चाललीस न ,येतांना माझ्यासाठी पेन्सिल शार्पनरस् आणायला विसरू नकोस" राजू मावशीला म्हणाला.पलीकडून मावशी म्हणाली "अरे तू सांगायला विसरला असतास तरी मी आणायचे ठरवलेच आहे, कारण स्टेशनरी मध्ये पेन्सिल शार्पनरस् बघीतली की आम्हाला तूच आठवतोस . कीचन मधून आई कौतुकाने ऐकत होती.

राजूचा पेन्सिल शार्पनरस् चा संग्रह प्रचंडच वाढला होता. वेगवेगळ्या रंगांचा , आकारांचा हा संग्रह पाहून घरात येणारे इम्प्रेस होत ,मग राजूची कॉलर टाइट. रोज ती ढीगभर पेन्सिल शार्पनरस् राजू पुसून ठेवायचा आणि शाळेतून आला की आधी त्या कॉर्नरवर एक नजर टाकणार, जर एक वस्तू एकडची तिकडे झाली की त्याला कळायचे मग राजूचा त्रागा आणि आईला त्रास हे रोजचेच झालेले.

त्या संग्रहाला राजूच्या आठवणीहि निगडीत झाल्या होत्या ,जसे हे शार्पनर ह्या दुकानातून घेतले, ते त्या मावशीने गिफ्ट दिले , हे राहुलने मागितले पण राजूने साफ नकार दिला ,ते पप्पांनी बंगलोर हून आणले ,हे आईकडून तुटले ,प्रचंड गोंधळ घातल्यावर पप्पांनी फेविकॉलने जोडून दिले, वगैरे वगैरे. संग्रह दिवसेंदिवस वाढत चालला. कीर्ती शाळेतही पोचली. मग ज्यांना माहित नाही ते बघायला घरी यायचे. म्हणायचे," वॉव, राजू तू ग्रेट आहेस", आई कौतुकाने पहायची आणि राजूची छाती गर्वाने फुगायची .

राजू नसला की पप्पा त्या कॉर्नर कडे पहात, हे फार होतेय असे ते म्हणत, आईलाही ते पटत होतं. पण करणार काय ,राजूला दुखवणे त्या दोघांच्याही बसकी बात नव्हती आणि हे काका आले. उद्या राजूची परीक्षा, त्यात घरचे काम, स्वयंपाक, आईची धांदल उडालेली. राजूचा अभ्यास झाला होता पण रिव्हिजन बाकी होती, आईने काकांनाच विचारले, राजूला त्या धड्याचे प्रश्न विचारता का म्हणून. काकांनी पुस्तक उघडले, विचारले कुठला धडा आणि स्वत:च वाचत बसले, अगदी हरवूनच गेले जणू. राजूने त्यांना भानावर आणले , म्हणाला विचारा प्रश्न, आणि काकांनी प्रश्न विचारायचा अवकाश, राजूचे धडधड उत्तर येत होते, आई समाधानाने हसली पण तिला एका गोष्टीचे आश्चर्य वाटले की काकांकडून अजून राजूला शाबासकी सारखे शब्द निघत नव्हते. इकडे राजू ही विचारात पडला की काका मंद आहेत का. काकांनी सर्व प्रश्न संपल्यावर विचारले ,

"राजू,अपरिग्रह म्हणजे काय ?". तिकडे आई चपापली, हा प्रश्न काही उद्या शाळेत विचारणार नव्हते. पण राजू म्हणाला सांगतो. आई उत्सुकतेने वाट पाहू लागली. राजू नेहमी बोर्नविटा रॅपिड फायर प्रश्नांच्या वेळी होतो तसा अस्वस्थ होऊ लागला, पण काकांनी त्याला शांत केले,"यु टेक युवर टाइम ", म्हणून ते शांतपणे,त्याच्याकडे उत्तेजनात्मक, आश्वासक नजरेने बघत राहिले. आपण ह्यांना मनात उगाच "मंद" म्हणालो असे राजूला आता वाटले, स्पर्धेची भावना निघून गेल्यावर त्याला चक्क शांत वाटले. "हाच प्रश्न वर्गात रोहनने विचारला होता" राजू म्हणाला, काका स्मित करून ऐकत होते. राजूने विचारात हरवत जवळचा पपांचा शब्दकोश घेतला, याचा अर्थ संग्रहच्या विरुद्ध. काकांनी हळूच पेन्सिल शार्पनर्सच्या संग्रहाकडे नजर टाकल्याचे राजूच्या नजरेतून सुटले नाही.

राजू म्हणाला," बुद्ध म्हणाले होते, सर्व दुखाचे कारण म्हणजे तृष्णा, हाव. म्हणून आपण 'अपरिग्रह' अंगिकारले पाहिजे." आणि अपरिग्रह म्हणजे संग्रह न करणे.

काकांनी कौतुकाने मन डोलावली व पाठीवर प्रेमाने शाबासकी दिली.

आई हसतच बाहेर आली म्हणाली "वा, आज अभ्यास अगदी आदर्श चाललाय ,चक्क शब्दकोश बघून उत्तर म्हणजे कमालच झाली".

पण राजू नेहमीसारखा फुशारला नाही, त्याचा चेहरा विचारी दिसत होता, काकाही विचारात पडले होते. स्वत:शीच बोलल्यासारखा राजू म्हणाला, सर्व दुखाचे कारण म्हणजे तृष्णा, हाव. आणि अपरिग्रह म्हणजे ....पुढचे शब्द तो बोलला नाही फक्त शार्पनरच्या संग्रहाकडे पाहत उभा राहिला.

काका म्हणाले ,"येस,राजू उद्याच्या परीक्षेत तुला ह्या धड्यावरचे चार मार्क्स तुला नक्की मिळतील "तेवढे पुरेसे आहेत की त्या पेक्षा जास्त काही हवे. तू हुशार आहेस आणि तू ऑलरेडी त्या विचाराजवळ पोचला आहेस, तुला तू सांगतो आणि करतो आहेस यातील तफावत जाणवली आहे”

पप्पा केव्हा आले ते कुणालाच कळले नव्हते ,ते ही उत्सुकतेने पाहत होते की याला न दुखवता कसे सांगायचे .

काकांनी विचारले,"मग करणार का आपल्या संग्रहाचा त्याग?"

पप्पा आणि आई जागीच थरारले, किती मेहनत केली होती पोराने, आता तो बिथरणार बहुतेक..

पण तसे काही च झाले नाही , बहाद्दर निर्भय निघाला , "काका,आई,पपा तुम्हीच सांगा, हा संग्रह मी कसा दिस्पर्स करू?"

आईच्या डोळ्यात पाणीच आले ,पपानी नाकाने सु सु आवाज काढला , मग काकाच म्हणाले,"उद्या बुद्ध पोर्णिमा ना , मग हा धडा शिकण्यासाठी या पेक्षा चांगला  दिवस कोणता"

" उद्याच शाळेत मित्रांना / शिक्षकांना कळव तू 'अपरिग्रह' भावनेचा आदर करण्यासाठी सर्वांची  मदत मागणार आहेस, जवळच्या अनाथाश्रमातील छोट्या मित्रानाही  बोलव.आणि जातांना त्यांना एकेक  शार्पनरस्  घेऊन जायला सांग.

एक छानसा फोटो काढ या संग्रहाचा सर्व मित्रांसमवेत. एक वही  ठेव, त्यात लिहायला सांग, मित्रांना काय वाटले तुझ्या अपरिग्रह ह्या साहसाविषयी.

राजूच्या चेहऱ्यावरचे निश्चयी भाव आता नेहमीच्या हसण्यामध्ये बदलले.आता मला तो धडा खरा कळला तो म्हणाला,उद्याच करतो ठरल्यासारखे, अपरिग्रह केल्यापासून टेन्शन जाऊन छान मोकळं वाटतय".

फुल मार्क्स काका मनापासून म्हणाले.



# 4}नोकर कोण आणि मालक कोण ---

***लेखक :श्रीपाद पु. कुलकर्णी***

गजाभाऊ घरी येऊन पाहातात तर बन्या आणि टिन्या दोघांच्याही  डोक्यावर गांधी टोपी अन त्यावर अक्षरं लिहिलेली, ‘मी अण्णा हजारे’.

"हे काय रे बन्या?" गजाभाऊंनी आश्चर्यानं विचारलं.

"बाबा, आम्ही आज मोर्चामध्ये गेलो होतो, अण्णा हजारेंच्या भ्रष्टाचारविरोधी आंदोलनाला पाठींबा देणाय्रा मोर्चात.."

"अरे, पण, भ्रष्टाचार म्हणजे काय आणि हे आंदोलन कशासाठी चाललंय हे तरी तुम्हाला माहित आहे का?"

"हो.. लाच घेऊन कामं करतात त्याला भ्रष्टाचार म्हणतात आणि त्यावर कंट्रोल ठेवण्यासाठी ‘जनलोकपाल’ नेमण्याचं विधेयक आणायचं म्हणून हे आंदोलन असं काही तरी तो राजूदादा सांगत होता." टिन्यानं नेमकी माहिती पुरवली आणि पुढं बोलू लागला, "पण काका, हा जनलोकपाल म्हणजे सरकारचा पण मालक होणार का? आत्ता पंतप्रधान आणि राष्ट्रपति असतात तसे....". टिन्याच्या या भाबड्या कल्पनांवर गजाभाऊंना हसावं की रडावं तेच कळेना. ते त्याला समजावत म्हणाले, "अरे, सारी जनता हिच खरी मालक आणि जनतेनं निवडून दिलेलं सरकार हे खरं तर नोकर. पण

सरकारी लोक जेव्हा आपणच साऱ्या देशाचे मालक आहोत असे वागू लागतात आणि खऱ्या मालकाकडून म्हणजे जनतेकडून गैरमार्गानं संपत्ती गोळा करू लागतात तेव्हा भ्रष्टाचार होतो. पण हे सारं समजायला तुम्हाला आणखी मोठं व्हावं लागेल. अरे, मला सांगा आपण आता आपल्या घरी भांडी धुणी करणाऱ्या मावशींना, आपल्या गाडीवरच्या ड्रायव्हर काकांना तरी नोकर म्हणतो का.... नाही .. मग मालक कोण आणि नोकर कोण हा वादच कशाला." गजाभाऊ थांबून मुलांचे चेहरे न्याहाळू लागले. त्यांचे गोंधळलेले चेहरे पाहून आणि जरूरीपेक्षा जास्तच गंभीर झालेले पाहून, हसून ते म्हणाले, "जाऊ दे, मी तुम्हाला एक आफ्रिकेतली जुनी गोष्ट सांगतो, म्हणजे हा तुमचा गोंधळ जरा कमी होईल."

"येऽऽऽऽ" गोष्ट म्हंटल्यावर मुलांनी गजाभाऊंसमोर बैठक मारली.

फार पूर्वी आफ्रिकेतल्या एका आदिवासी जमातीच्या राज्याचा एक स्वयंघोषित राजा होता... मुमुंबा त्याचं नाव. आपल्या राज्यात 'ऑल इज वेल' असं त्यानं जाहिर करून टाकलं होतं. आपली प्रजा आपल्यामुळं सुखासमाधानात राहते आहे अशी त्याची ठाम समजूत होती. त्या गर्विष्ठ राजानं सगळ्या प्रजेला 'हम करे सो कायदा' असं करून आपल्या धाकाखाली ठेवलं होतं. एकदा तर त्यानं आपल्या झोपडीसारख्या दिसणाऱ्या 'राजवाड्या'च्या पुढच्या भल्यामोठ्या आवारात जनता दरबारच भरवला. राज्याच्या निरनिराळया गावांतून नागरीक आपल्या राजाला भेटण्यासाठी, त्याची खुशामत करण्यासाठी आले होते. घमेंडखोर मुमुंबानं एवढे लोक आपल्याला भेटायला आलेले पाहून जाहिरच करून टाकलं "प्रजाजनहो, माझा राज्यकारभार पाहून आणि माझी हुकुमत पाहून तुम्हीही  मान्य कराल की माझ्या कर्तुत्वानं मी सगळ्यांचा मालक आहे आणि माझ्यापुढे हांजी हांजी करणारे तुम्ही सारे लोक माझे नोकर आहात."

"चुकताहात, महाराज तुम्ही.." एक घोगरा वयस्कर आवाज आला त्या गर्दीतून तसं साऱ्या लोकांच्या मनात धस्स झालं. "... या जगात सारे लोक एकमेकांचे नोकर आहेत, महाराज." बापरे... मुमुंबापुढे ब्र काढण्याची कोणाची छाती नसताना हे साहस कोणी केलं म्हणून जो तो इकडं तिकडं पाहू लागला. मुमुंबाचा चेहरा तर रागानं आणखी काळा झाला आणि त्याच्या दगडी सिंहासनावरून तो उठलाच.

"कोण बोललं हे? कोणी धाडस दाखवलं हे सांगण्याचं की मी सुद्धा एक नोकरच आहे म्हणून..?"

"मी, महाराज,..." असं बोलत एक म्हातारबाबा गर्दीतून वाट काढत पुढे आले. कमरेला झावळ्या गुंडाळलेल्या, पांढरी वाढलेली दाढी अशा अवतारातला तो माणूस पाहून मुमुंबा ओरडलाच, "कोण रे तू?"

"माझं नाव बुवा... माझं गाव उबगा.. आपल्या राज्याच्या दक्षिण टोकाला आहे. तिथं पाण्याची फार टंचाई आहे हो, म्हणून आमच्या गावात एक तरी विहिर खोदून द्यावी ही विनंती करायला आलो होतो." बुवा थांबला.

"म्हणजे तू तर माझ्यापुढं भीक मागतो आहेस आणि वर म्हणतोस जगातले सगळे लोक एकमेकांचे नोकर आहेत."

"हो महाराज, तेच खरं आहे. हवं तर मी तुम्हाला ते सिद्ध करून दाखवेन आज रात्रीपर्यंत." बुवा न घाबरता बोलला.

"ठीक आहे." मुमुंबा घमेंडीतच उद्गारला..."मला तुझ्या म्हणण्याप्रमाणं वागावं लागलं... काही करावं लागलं तर मी तुझं म्हणणं मान्य करेन, एवढंच नव्हे तर एक का मी तुमच्या गावात तीन तीन विहिरी बांधून देईन. पण जर तु तुझं म्हणणं सिद्ध केलं नाहीस तर तुझं मुंडकं छाटण्यात येईल एवढं लक्षात ठेव."

"महाराज, आमच्या गावाची एक प्रथा आहे. आम्ही जेव्हा दुसऱ्यानं दिलेलं आव्हान स्वीकारतो तेव्हा नम्रपणे प्रतिस्पर्ध्याच्या पायांना हात लावून त्याचा आदर करतो. तुम्ही तर महाराज आहात आणि मी तुमचं हे आव्हान स्वीकारलेलं आहेच.. तेव्हा मला तुम्हाला वाकून नमस्कार केलाच पाहिजे...." असं म्हणून बुवा राजाच्या पायांना हात लावण्यासाठी वाकू लागला... तेव्हढ्यात तो मुमुंबाला म्हणाला, "महाराज, माझी ही काठी धरता का जरा....." मुमुंबानंही  लगेच म्हातारबुवांची काठी घेतली हातात आणि मग बुवानं मुमुंबाच्या पायांना दोन्ही हातांनी स्पर्श केला.

मुमुंबानं हे झाल्यावर काठी बुवाच्या हवाली केली. तसं बुवा म्हणाला, "महाराज, मिळाला नं तुम्हाला माझ्या म्हणण्याचा पुरावा?"

"पुरावा....?" मुमुंबानं गोंधळून बुवाला विचारलं.

"हं...माझं म्हणणं मी सिद्ध केलं, महाराज. मी तुम्हाला माझी काठी धरायला सांगितली.. तुम्ही  धरली आणि परत मला दिलीतसुद्धा. म्हणून मी म्हणतो, तुमच्यासारखे सारे चांगले लोक एकमेकांचे नोकर..... नोकर म्हणण्यापेक्षाही  चांगले सहकारी असतात."

"वा...वा... काय हुशार होता हा बुवा, बाबा!" बन्यानं दाद दिली तसे गजाभाऊ म्हणाले, "म्हणून तर मुमुंबाही  एवढा खूश झाला की त्यानं बुवाच्या उबगा गावात कबुल केल्याप्रमाणं तीन विहिरी तर बांधून दिल्याच शिवाय बुवाला आपला मुख्य सल्लागार म्हणून नेमून टाकला."

## १. दिवाळी... अरविंद बुधकर



नवीन स्वप्ने घेउनी आली
मुलांनो करू साजरी या दिवाळी !!

आम्ही दिले पंख हो स्वप्नांना
आकाश कवेत घेउनी उडताना
पाहिली घरटी या समाधान सावली !!

आज वरी अंगणी जीवनी
संचिताने घातली रांगोळी
रंग भरूनी आम्ही चित्रे आकारली !!

वाट चाललो घेऊन हात हाती
उंच भरारी घेऊन नाती गोती
सांभाळ करा हे आता तुमच्या ओंजळी !!

विसरू नका दिस जे आले
दु:ख नको करा क्षणांचे सोने
येतील यशो किरणे सारुनी काजळी !!

दीप दीप लावूनी उजळू शिवार सारा
कल्पनेचे पंख लावू आणू भाग्य आकारा
ऐक्याचा कंदील घेउनी रहा तुम्ही जवळी !!



## 2}रवीवारची शाळा-- विशाल कुलकर्णी

जंगलातल्या गावी एकदा
रवीवारची भरली शाळा
हिरमुसलेली पिल्ले बघूनी
बाई म्हणाल्या...खुप खेळा !

वाराकाका गातो गाणी
कोरस देती झाडे-वेली
पाऊसदादा ठेका धरतो
नाच करतसे खारुटली...

ससुल्यादादा सराव करतो
फेऱ्या मारीतो डोंगरावरी
कासवभाऊ खुदकन हसले
माझाच पहिला नंबर तरी...

फुलपाखरे इवली इवली
बागडती आनंदे फुलांवरी
सुट्टी-बिट्टी नकोच मजला
मधमाशीताई व्यस्त भारी ...

कामात गुंतले गाढवदादा
बाई वाटती बिस्कीट पुडे
चुकार कोल्हा आळशी कुठला
डोळा त्याचा बस खाऊकडे...

हत्तीदादा खुतून बसले ...
एवढेसे मज कसे पुरावे?
दिला तुला जर सगळा खाऊ
इतरांना मग काय उरावे?

नेहमीप्रमाणे उशीरा आले
मनीमाऊ आणि वाघभाऊ
रुसून बसले कळले जेव्हा
संपून गेला सगळा खाऊ...

चला मुलांनो शाळा सुटली
सांगत-सांगत संध्या आली
पुन्हा भेटूया उद्यास म्हणूनी
दमलेली पिल्ले घरी पळाली...

3}. ए आई, सांग नाSSSSS, कधी येइल बाबा घरा?
ए आई, सांग ना, कधी येइल बाबा घरा?
ए आई……,सांग ना SSSSS!



आता गोष्ट नको आम्हाला,
गाण्यातला रस संपला!
लुटुपुटीच्या भातुकलीचा,
आला खुप खुप कंटाळा SSSS!
ए आई, सांग ना SSSSS, कधी येइल बाबा घरा?

नकोच आई मजला,
चॉकलेटचा तो बंगला !
अन बर्फीची ती झाडे,
इथे आहेत, हवी SSSS कुणाला?
ए आई, सांग ना SSSSS, कधी येइल बाबा घरा?

राजपुत्र अन परीराणीच्या,
गोष्टींचा स्टॉकही संपला !
टॉम अँड जेरी, पापायनेही,
बघ जीव; आमचा SSS उबला !

ए आई, सांग नाSSSSS, कधी येइल बाबा घरा?



चिवचिव करती चिमणपिले,
चोचीतच घास राहीला !
असेल का गं गेला ?
त्यांचाही बाबा टूरSSS ला?
ए आई, सांग नाSSSSS, कधी येइल बाबा घरा?

बघ चांदोबा तो रुसला,
चांदण्याही…, बघ धुसफुसल्या !
अंगाई नच रुचे आम्हाला,
आम्हा हवाय बाबा……, थोपटायलाSSSSS !
ए आई, सांग नाSSSSS, कधी येइल बाबा घरा?

या कवितेला देवकाकांनी (श्री. प्रमोद देव) लावलेली चाल इथे ऐकता येईल.

http://majhigani.blogspot.in/2009/07/blog-post_28.html

## 5}कुठे गेली शिस्त !

-- श्रीपाद पु कुलकर्णी



बाबा सांगतात, "घरात पाळा रे शिस्त"
बाई सांगतात, "मुलांनो, शाळेत पाळा शिस्त"
काका सांगतात, "..जरा सोसायटीत पाळा शिस्त"
या थोरांच्या सांगण्यावर ठेवली आम्ही भिस्त
पण हेच थोर रस्त्यावरती का वागतात बेशिस्त ?

रस्ता ओलांडताना प्रथम उजवीकडे बघितले
तर स्कूटरवाले काका उलटे डावीकडून आले
"हॉर्न ऐकू येईना का?"  मलाच ओरडले
अरेरावी करण्यात ना वाटे यांना खंत
रस्त्यावरती हेच थोर का वागतात बेशिस्त ?

शुद्धलेखनात बाई घालतात चिन्हांचा लगाम
रस्त्यावर गाडी यांची पळते मात्र बेफाम
चौकातला दिसत नाही त्यांना 'पूर्ण विराम'
सिग्नल तोडून जाताना वाटे त्यांना मस्त
रस्त्यावरती हेच थोर का वागतात बेशिस्त ?

बाबांनी गाडी एकदा एका गल्लीत नेली
`प्रवेश बंद' पाटी दिसूनही नाही बघितली
पोलिसाची त्यांनी मग हळूच 'समजूत' घातली
म्हणाले, "सटकलो की नाही बिनधास्त !"
रस्त्यावरती हेच थोर का वागतात बेशिस्त ?

*****************************************************************

## 6} कोकण महाराष्ट्राची शान ….. तनया देवळे

देवबाग म्हणजे देवाची बाग
म्हणतात ते खोटं नाही
समुद्राकाठी बहरलेली झाडी
मुंबईत शोधून सापडणार नाही

तारकर्ली चे पाणी स्वच्छ
न प्रदूषण न घाण
जुहूच्या समुद्राची राहीली
न स्वच्छता न शान
कोकणाचे रक्षण करायला उभा
हा सिंधुदुर्ग कील्ला
कीती सुंदर हे कोकण
जिथे आहे हा भाग्याचा गल्ला
स्वर्गापेक्षा रम्य लंका
लंकेपेक्षा कोकण रम्य
तारकर्ली देवबाग आणि गणपतीपुळ्या
पुढे
लंकासुधा होईल सामान्य

कोकणात जाऊन मालवणी नाही खायचे
तर जायचेच कशाला???
शुद्धशाकाहारी सुद्धा जाऊन आणतात
खास मालवणी मसाला!!!
कोकणाचं कीती करू
तितक कमी कौतुक
एकदाच गेलात तरी होऊन जाईल
कोकणाशी मनाची गुंतवणूक
कोकणात गेलो की येतो
उत्साह आणि जान
कारण इथलं वैशिष्ठ्य म्हणजे
फळांचा राजा आंबा माझा जीव की प्राण,,,
खरोखरच,,कोकण आहे महाराष्ट्राची
शान!!!!

तनया देवळे इयत्ता ८ वी

7)"बंडूचा रेनकोट"... ज्योती कपिले.



बंडू रुसून बसला, नव्या रेनकोटसाठी
हाताची घडी अन ओठांची गुप मिठी
रेनकोटला जुन्या पडली होती भोकं
पावसात बंडूच भिजलं होत डोकं
गाल फुगवून बसली स्वारी
काही केल्या बोलेना
टपटप टपटप डोळ्यातला
पाऊस काही थांबेना!
बाबा बंडूला मग,हळूच गुदगुल्या करून हसवी
आईने काढली हळूच कपाटातून पिशवी
मिकी माऊसची चित्रे रेनकोटवर पाहीली

बंडोबाची कळी मग कशी पटकन खुलली
रेनकोट घालून बंडू तयार होऊन बसला
पण आता,पाऊसच आहे बंडूवर रुसला..

8)"तडम तडम तडतड ताशा"... ज्योती कपिले.



विजेने कडाडून दिली वर्दी
काळ्या ढगांची जमली गर्दी

तडम तडम तडतड ताशा
वाजवत  आला पाऊस राजा
सरीवर सरी भिजली धरणी
मृद्‌गंध गेला गगनी
हिरवीगार डोंगरदरी
सुजलाम सुफलाम निसर्गराणी!



*************************************************************

9}"मित्र माझे छान छान ...!

अरुण वि .देशपांडे -पुणे



पोपटराव -पोपटराव
कीत्ती छान बोलता राव
खा -खा ,मिरची नि- पेरू
मग हो छान गप्पा मारू ...........|| १ ||
ये ग , ये  कोकीलाताई
छान छान गाणे गाई
गोड आवाजात म्हणता तू
आनंद मनास आमच्या होई ......|| २ ||
चिऊताई ओ  चिऊताई
बाळ बघा रुसला  बाई
छान गोष्ट सांगा त्याला
तुम्हीच त्याला हसवा बाई  ........|| ३ ||
माकडभाऊ माकडभाऊ
तुमच्यासाठी आणलाय खाऊ
चला आपण दोघ मिळून
मस्त मस्त झोका घेऊ  .............|| ४
****************************************************

## फळभाज्यांची सभा..

सौ. प्राजक्ता पराग म्हात्रे

एकदा फळ भाज्यांची सभा भरली
प्रत्येकाने आपआपलीस्तुती गायली

काकडी म्हणाली,
मी कधी सरळ कधी वाकडी
सगळ्यांत थंड आहे मी एकटी

गाजर म्हणाला,
रंग माझा सगळ्यांत सुंदर
माझ्यामुळे स्वच्छ होते नजर

बीट म्हणाला,
भोवऱ्याच्या आकाराचा मी बीट
माझ्यामुळे राहतात सगळे फिट

टोमॅटो म्हणाले,
माझा रंग आहे लालेलाल
माझ्यामुळे होतात गुलाबी गाल

कांदा म्हणाला,
मी आहे जरासा तिखट
खावून मला चव जाते फिकट

मुळा म्हणाला,
माझा रंग स्वच्छ, सफेद
मला खाताना कसला खेद?

सगळ्यांची मग गट्टी झाली
कोशिंबीर नावाची टीम त्यांनी केली.

*************************

10} चक्रम-विक्रम..

शशिकांत पानट

एक होता राजा
त्याचे नांव विक्रम
विचार येती त्याच्या डोक्यांत
नेहमी नेहमी चक्रम! १

एकदां राजा बसला होता
एकटा आपल्या दरबारांत
भल्या मोठ्या मिशीला
मोठ्या प्रेमाने कुरवाळत! २

त्याच्या डोक्यांत एकदम
नवा नवा विचार आला
त्याने फर्मान काढले
की संगीतांतच बोला! ३

कुणी बोलले गद्यांत
तर त्याचे मुंडके ऊडविन
संगीतांत बोललांत तर
छान छान बक्षिस देईन ४

त्याची प्रजा आतां
संगीतातच बोले
दरबाराचे कामकाज
तासन तास चाले ५

दरबाराच्या कामकाजांत
सचिव घेती ताना
सारे मंत्रमुग्ध होऊन
डोलाविती माना! ६

दरबारांतले लोक
त्यांना कांही कळेना
सारखे सारखे संगीतांत
त्यांना बोलणे जमेना ७

सचिव मात्र मोठा हुशार
त्याने एक युक्ती केली
खूप विचार करुन त्याने
राजाला अद्दल घडविली ८

एकदा मोठी आग लागली
भल्या मोठ्या राजवाड्याला
हूकुमा-शिवाय राजाच्या
कुणी नाही विझवायला ९

सचिव गेला दरबारांत
घेतल्या ताना पांच सात
त्यांत एव्हढा वेळ गेला
की राजवाडाच जळून गेला १०

मग राजाच्या लक्षांत आला
घोटाळा त्याच्या फर्मानाचा
दरबार भरवून सत्कार केला
त्याने हुशार सचिवाचा! ११

असा होता एक राजा
त्याचे नांव विक्रम
मधून मधून करतो
तो नवे नवे विक्रम! १२

## 11}आभाळाच्या पलीकडे...

शशिकांत पानट

गरुडाच्या पंखावर बसुनी
ऊंच भरारी घेवू या!
आभाळाच्या पलीकडल्या त्या
चंद्र-चांदण्या पाहु या! ॥१॥ धृ

येते कुठूनी ईंद्रघनु ते
क्षितिजावरती छान दिसे
क्षणांत दिसते, क्षणांत नसते
मजे मजेचा खेळ असे
कडाडणारी वीज कुठूनी
येत असे ती पाहू या! ॥२॥ धृ



ढगामागुनी पाऊस पडतो
मुसळधार हा थेंबांचा
कधी पडतसे सडा पांढरा
डोंगर रचुनी बर्फाचा
ढगांत बसुनी, गडगडणारे
कोण हंसे ते पाहू या! ॥३॥ धृ

चढून जावून ऊंच शिडीने
चंद्रावरती हिंडू या!
प्रकाश चंद्रावरुनी येतो
कसा तो तरी पाहू या
आभाळांतीलम्हातारीला
दळतांना अन पाहू या! ॥४॥ धृ

12}वळीव…

मंगेश मेढी,

तळेगांव दाभाडे, मावळ, ९८८१४९०१४७

धडाम धुडूम धडाम धडूम ढगांचा ढोल
कडाडकड कडाडकड विजेचा ताशा
सोसाट्याचा वारा संगे पावसाचा ताफ़ा

आला आला आला आला वळीव आला बघा वळीव आला
साऱ्यांची धावपळ धुळीची वावटळ
लखलखत्या उजेडात झाडांचा रॉक

आला आला आला आला वळीव आला बघा वळीव आला
बत्ती गुल फ़ोन बंद कामे सारी पडली बंद
निसर्गाचा तांडव बघायची मज्जा

आला आला आला आला वळीव आला बघा वळीव आला
धोबी पछाडने धुतले रान वाहुन गेली सगळी घाण
पहील्या पावसाने चिंब स्नान न्हाऊन निघाले अंग छान

आला आला आला आला वळीव आला बघा वळीव आला

## 13} पाऊस आला पाऊस आला

धो-धो पाऊस आला धो-धो पाऊस आला
टपटप टपटप थेंबांचा नाच तड-तड तड-तड गारांचा ताल
गारा वेचायची शर्यत लावू कागदच्या होड्यांची स्पर्धा खेळू
ओले चिंब भिजुन न्हाऊ  आईचा ओरडा रेनकोट घाल रेनकोट घाल

धो-धो पाऊस आला धो-धो पाऊस आला
झरझर झरझर सरीवर सर गडगड गडगड गरजती ढग
बेडकाचे गाणे ऐकून हसु सरी संगे नाच नाचू
रंगांची कमान आभाळात छान आजोबांच एकच पुरे रे आता पुरे रे आता

धो-धो पाऊस आला धो-धो पाऊस आला
रपरप रपरप पनांचा साद काडकाड काडकाड विजेचा रॉक
गोल गोल फ़ेर धरु पावसाची गाणी म्हणू
धडामधुडूम आवाजाने घरात पळू साऱ्यांचा गलका
फ़िटली ना हौस फ़िटली ना हौस





## विद्यार्थ्यांशी हीतगुज

शाळेतली मुलं जेव्हा 'आम्ही कुठली पुस्तकं वाचावी?' असं मला विचारतात, तेव्हा मी त्यांना सांगतो, 'तुम्हांला जी वाचावीशी वाटतील, ती वाचा.' काही मुलं थोडासा अपराध्यासारखा चेहरा करुन सांगतात, 'आम्हांला रहस्यकथा आवडतात'. मग मी म्हणतो, 'मग रहस्यकथा वाचा.'. माझ्या शाळकरी वयात मी डिटेक्टिव्ह रामाराव, भालेराव यांच्या गुप्त-पोलिशी चातुर्याच्या कादंबऱ्यांचा फडशा पाडत असे. माझ्या आयुष्यात 'पुस्तक' ही गरज व्हायला हमा करमणूक करणाऱ्या पुस्तकांनी खूप मदत केली. हळूहळू त्याहूनही अधिक चांगलं वाचायची ओढ लागते. ज्या घरात आणि समाजात आपण वाढत असतो, त्याचे आपल्या मनावर संस्कार होत असतात. त्यांतून आवडीनिवडी ठरायला लागतात. शाळेत शिकताना एखादा विषय आपल्याला विशेष आवडायला लागतो. एखादा खेळ अधिक आवडतो. आपल्या आवडीचा जो विषय असेल, त्यावरचं पुस्तक आपल्याला वाचावंसं वाटतं. त्या विषयावर वाचलेलं अधिक लक्षातही राहतं. क्रिकेट आवडत असलं, तर दहा वर्षांपूर्वीचा एखादा टेस्ट- मॅचचा स्कोअर तपशीलवार आठवत असतो. कुठल्या खेळाडूचा त्रिफळा उडाला, कोणी कोणाच्या गोलंदाजीला कुठं झेल घेतला, कोण धावचीत झाला- कोण पायचीत झाला, सगळं काही आठवत असतं. पण न आवडणाऱ्या भूमितीतलं प्रमेय पन्नास वेळा वाचूनही आठवत नाही. शेवटी हा आवडीनिवडीचा प्रश्न आहे पण केवळ वैयिक्तक आवडिनिवडीचा प्रश्न आहे, म्हणून सोडून देता येत नाही. वाचनाची आवड जोपासावी कशी, याचाही विचार करायला हवा.

पुस्तकाचं वाचन करायची कारणं अनेक असू शकतात. शाळा-कॉलेजात परीक्षेला नेमलेली पुस्तकं वाचायची सक्ती असते. म्हणून ती वाचावी लागतात. आणि सक्ती आली की तिटकारा आलाच. रोज आइसक्रिम किंवा भेळ खायची जर सक्ती झाली, तर आपल्याला अत्यंत आवडणाऱ्या हमा पदार्थांचासुद्धा तिटकारा येईल. त्यामुळं पुष्कळ विद्यार्थ्यांच्या मनात पुस्तकासंबंधी खरा प्रश्न उभा राहतो, तो त्यांना सक्तीनं वाचायला लागणाऱ्या पाठ्यपुस्तकांसंबंधी. कारण इथं पुस्तक आनंदासाठी वाचलं जात नाही; नाही वाचलं तर नापास होऊ, हमा भीतीनं वाचलं जातं. त्याला माझ्या मतानं एकच उपाय आहे; तो म्हणजे ते पुस्तक 'पाठ्यपुस्तक आहे' अशा दृष्टीनं कधी वाचू नये. पाठ्यपुस्तक ही त्या पुस्तकावर सोपवलेली एक निराळी कामगिरी आहे. चांगल्या ग्रंथकारांनी जे ग्रंथ लिहीले, ते मुलांना परिक्षेत मार्क मिळवून द्यायची सोय करावी म्हणून लिहीले नाहीत. समजा, तुमचं इतिहासाचं पुस्तक असलं, तर ते आपले वीरपुरुष कोण होते, परकीयांची आक्रमणं कां झाली? ती आपण कशी परतवली कमी पडलो तर कां कमी पडलो? हे सारं सांगत आलेलं असतं. ते वाचत असताना तुमच्या मनात प्रश्न उभे राहतील. त्याची उत्तरं शोधायला ते पुस्तक पुरेसं उपयोगी पडलं नाही तर तुम्ही दुसरं इतिहासाचं पुस्तक पहाल, गुरुजींना विचाराल. तुम्हांला इतिहासाचं ते पुस्तक परीक्षेसाठी लावलेलं पाठ्यपुस्तक न वाटता इतिहासाबद्दल तुमच्याशी बोलणाऱ्या मित्रासारखं वाटेल.

पुष्कळ वेळा मला मुलं असंही विचारतात, की आम्ही काही योजनापूर्वक वाचन करावं का? ही योजना करणंदेखील पुष्कळसं तुमच्या आवडिनिवडीवर राहील. पण साधारणपणानं आपल्या आहारात ज्याप्रमाणं चांगल्या आरोग्यासाठी समतोल आहार घ्यावा असं सांगतात, तसाच पुस्तकांतून मनाला मिळणारा हा आहार समतोल असावा. नुसतीच

करमणुकीची पुस्तकं वाचणं हे नुसत्याच शेवचिवड्यावर राहण्यासारखं आहे. पुस्तकांनासुद्धा खाद्यपदार्थांसारखेच गुणधर्म असतात. म्हणूनच म्हटलंय, की काही पुस्तकं चघळायची असतात, काही खूप चावून चावून पचवावी लागतात, काही एकदम गिळता येतात. पण अन्नासारखंच पुस्तकही पचवायचं असतं. पण पचायचं नाही असं समजून वाचायचंच नाही, हे मात्र चूक आहे. प्रत्येक पुस्तक वाचायला सुरुवात करणं, हे नव्या प्रवासाला सुरुवात करण्यासारखं आहे. कधी कल्पनेच्या प्रदेशात, कधी विचारांच्या जगात, कधी विज्ञानाच्या राज्यात, कधी वनस्पतींच्या दुनियेत-कुठल्या पानावर मनाला आल्हाद देणारं, आधार देणारं किंवा अंतर्मुख व्हायला लावणारं काय मिळेल ते सांगता येणं कठीण आहे. एखादाच विचार मिळतो आणि आपलं जीवन उजळून जातो. गांधीजींच्या हातात रिस्कनचं अन्टु द लास्ट- (अंत्योदय) हे पुस्तक आलं आणि त्यांना त्यांच्या जीवितकार्याला विचारांची बैठक मिळाली. पुस्तकच कशाला, एखादी कवितेची ओळखसुद्धा आयुष्यभर सोबत करत राहील! पुस्तकांचा संग जडलेल्या माणसाला कधी एकटं राहावं लागत नाही. खूप थोर माणसं त्याच्याशी संवाद साधायला त्याच्या पुस्तकांच्या कपाटात पाठीला पाठ लावून उभी असतात.

*********************************************************************
****************************************

# कुश लव रामायण गाती



श्रीरामचंद्राच्या अश्वमेध यज्ञासाठी अयोध्येंत माणसांचा महासागर जमला होता. तापस वेष धारण केलेले दोन बटु मंडपांत आले. ते म्हणाले “आम्ही महर्षि वाल्मीकींचे शिष्य आहोंत. आम्ही रामचरित्रगायन करतो.” श्रीरामांना माहीत नव्हतें की आपल्यासमोर आपल्या चरित्राचें गायन करणारे हे बटु आपलेच पुत्र आहेत.

स्वयें श्रीरामप्रभू ऐकती
कुश लव रामायण गाती

कुमार दोघे एक वयाचे
सजीव पुतळे रघुरायाचे
पुत्र सांगती चरित पित्याचे
ज्योतिनें तेजाची आरती

राजस मुद्रा, वेष मुनींचे
गंधर्वच ते तपोवनींचे
वाल्मीकींच्या भाव मनींचे
मानवी रूपें आकारती

ते प्रतिभेच्या आम्रवनांतील
वसंत-वैभव-गाते कोकील
बालस्वरांनी करुनी कीलबिल
गायनें ऋतुराज भारिती

फुलांपरी ते ओठ उमलती
सुगंधसे स्वर भुवनीं झुलती
कर्णभुषणें कुंडल डुलती
संगती वीणा झंकारिती

सात स्वरांच्या स्वर्गामधुनी
नऊ रसांच्या नऊ स्वर्धुनी
यज्ञ-मंडपीं आल्या उतरुनी
संगमी श्रोतेजन नाहती

********************

# संस्कार

वाणीवर संस्कार होण्यासाठी ...

माणसाचे व्यक्तिगत जीवन निरामय,संस्कारीत,विकसीत व्हावे व त्याद्वारे उत्तम,चारित्र्यसंपन्न,सुसंस्कारीत पुरुष निर्माण व्हावे.त्याद्वारे,चांगला समाज व पर्यायाने एक चांगले व सुसंस्कृत,बलशाली राष्ट्र निर्माण व्हावे हा यामागील प्रमुख उद्देश आहे.

प्रात:प्रार्थना

वक्रतुंड महाकाय सूर्यकोटिसमप्रभ ।

निर्विघ्नं कुरु मे देव सर्वकार्येषु सर्वदा ॥

हात पाहून म्हणावयाचा श्लोक

कराग्रे वसते लक्ष्मी : करमुले सरस्वती ।

करमध्ये तु गोविन्द : प्रभाते करदर्शनम ॥

भोजनश्लोक

वदनि कवळ घेता नाम घ्या श्रीहरीचे

सहज हवन होते नाम घेता फ़ुकाचे ।

सायंप्रार्थना

शुभं करोति कल्याणं आरोग्यं धनसंपदा ।

शत्रुबुध्दीविनाशाय दीपज्योति नमोऽस्तुते ॥

# रेसेपी

१) बीट जाम ,

साहित्य :- १ किसलेला बीट , २ चमचे तूप , दीड वाटी साखर , वेलची पावडर , आवडीप्रमाणे काजू बदाम .

कृती : जाड बुडाच्या पतेलात टाकून तूप गरम झाल्यावर बीट टाकून वाफ काढावी . नंतर त्यात साखर टाकून आटून द्यावे . पाणी पूर्ण आटल्यावर त्यात वेलची टाकावी. आवडीप्रमाणे काजू बदाम टाकावे. थंड झाल्यावर काचेच्या बरणीत भरून ठेवावे. मुलांना तसेच किवा दुधात टाकून द्यावे दुधात टाकल्यावर छान गुलाबी रंग येतो मुलांना पौष्टिक मिल्क शेक खूप आवडेल .

२) कवठ जेली

साहित्य :  १ कवठ , गुळ दीड  वाटी ,

कृती  :  १ कवठचा गर काढून घेऊन अंदाजे १ वाटी गर निघेल त्यात २ वाटया पाणी टाकून अटवावे , १ वाटी पाणी शिल्लक राहील तोपर्यंत  आटवावे , आता तो गर गाळणीने गळून घेऊन त्या पाण्यात गुळ टाकून आटवावे, पाकासारखा घट्ट होत आल्यावर थोड वाटीत पाणी घेऊन १ थेंब पाण्यात टाकून पाहणे गोळी बनून जर पाण्यात तळाला बसली तर ते १ ताटाला तेल लाऊन त्यावर ते मिश्रण टाकावे थंड झाल्यावर त्याच्या हव्या तश्या वाड्या पाडाव्यात . प्लास्टिक कागदात जेली गुंडाळून ठेवावी मुलांना हवी तेव्हा द्यावी मुलांना वेगळ्या चवीची जेली खूप आवडेल. …….

मनिषा ….

